अधिव्याख्याता, पॅकेजिंग टेक्नॉलॉजी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावरील नियुक्ती रद्द करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. ससेनि-३२१४/प्र.क्र.६९/१४/तांशि-७,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. ०८ मार्च, २०१७

पहा : या विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि. २५ जुलै, २०१४.

प्रस्तावना :

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत ०३ उमेदवारांना अधिव्याख्याता, पॅकेजिंग टेक्नॉलॉजी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर संदर्भाधिन शासन निर्णयाव्दारे दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती देण्यात आली होती. सदर नियुक्ती आदेशामध्ये संबंधित ०३ उमेदवारांना रुजु करुन घेताना त्यांच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना रुजु करुन घेवून अहवाल पाठविण्याबाबत संस्थाप्रमुखांना निर्देश देण्यात आले होते.

०२. नियुक्ती देण्यात आलेल्या ०३ उमदेवारांपैकी गुणवत्ता क्र. ०२ येथील उमेदवार श्रीमती लक्ष्मी सपकाळ संबंधित संस्थेत रुजु झाल्या नाही. गुणवत्ता क्र. ०३ येथील उमेदवार श्री. राहुल आठवले हे संस्थेत दि. २१ ऑगस्ट, २०१४ रोजी रुजु होण्यासाठी गेले असता, त्यांची शैक्षणिक अर्हता ही पॅकेजिंग टेक्नॉलॉजी या अभ्यासक्रमाकरीता शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१३/(४५/१३)/तांशि-२, दि.०६ मे, २०१३ मध्ये दर्शविल्यानुसार नसल्याचे प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर यांनी त्यांच्या दि. २१ सप्टेंबर, २०१४ च्या पत्राव्दारे लक्षात आणून दिले आहे. सबब, गुणवत्ता क्र. ०२ व ०३ येथील उमेदवार श्रीमती सपकाळ व श्री. आठवले यांनी धारण केलेली शैक्षणिक अर्हता अधिव्याख्याता, पॅकेजिंग टेक्नॉलॉजी या पदाकरीता ग्राह्य धरता येणार किंवा कसे? याबाबत संचालनालयाकडून अहवाल मागविण्यात आला होता.

०३. श्री. राहूल आठवले व श्रीमती लक्ष्मी ज्ञानेश्वर सपकाळ यांनी धारण केलेली शैक्षणिक अर्हता अधिव्याख्याता, पॅकेजिंग टेक्नॉलॉजी या पदाकरीता ग्राहय धरण्यात यावी, किंवा कसे हे ठरविण्याकरीता तंत्र शिक्षण संचालनालाय स्तरावर समिती गठीत करण्यात आली व त्यांची बैठक दि.०८ जून, २०१६ रोजी संचालनालयात आयोजित करण्यात आली होती.

सदर समितीने दि.२४.०६.२०१६ रोजी अहवाल सादर केला असून, सदर अहवालात त्यांनी खालीलप्रमाणे निष्कर्ष नोंदविलेले आहेत.

1. The rationale of packaging technology is on containing, protecting, preserving and communication the packaged product.
   Whereas the rationale of Printing Enggs. & Comm. Technology is on ‘communication’ aspect with suitable combination of ‘printing processes’ and ‘printed products’.

2. After 'mapping' the courses, the coverage of packaging related courses is hardly about 17% at core/ applied technology levels.
   The candidates under the discussion who are graduates in Printing Engg. & comm. Technology have studied only 3 out of 18 courses prescribed for Packaging Technology.
   Hence, the committee concludes that these 2 candidates with the qualification in Printing Engg. & Communication Technology, are not suitable for the post of Lecturer in Packaging Technology at polytechnic level.

सबब समितीचे निष्कर्ष लक्षात घेऊन श्रीमती सपकाळ व श्री. आठवले यांची अधिव्याख्याता, पॅकेजिंग टेक्नॉलॉजी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावरील नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत श्रीमती सपकाळ व श्री. आठवले यांना अधिव्याख्याता, पॅकेजिंग टेक्नॉलॉजी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदासाठी खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार संदर्भाधिन शासन निर्णयाव्दारे देण्यात आलेली स्थानापन्न नियुक्ती या शासन निर्णयाव्दारे रद्द करण्यात येत आहे.

| अ.क्र. | गुणवत्ता क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नाव | वर्गवारी | आयोगाने शिफ़ारस केलेला प्रवर्ग | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | श्रीमती लक्ष्मी ज्ञानेश्वर सपकाळ | अ.जा. | महिला वर्गवारीसाठी राखीव असलेल्या एका पदासाठी | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर |
| २ | ३ | श्री. राहुल चंद्रकांत आठवले | अ.जा. | अ.जा. वर्गवारीकरीता राखीव असलेल्या एका पदासाठी | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर |

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१७०३१५११०६०४३९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea059 63bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759 420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.03.15 11:08:25 +05'30'

( सुधीर जया शेट्टी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति :**

संबंधित उमेदवार (पोच देय नोंदणीकृत डाकेने)

**प्रत :**

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे)
२) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई.
३) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, नागपूर.
७) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ) महाराष्ट्र-२, नागपूर.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१०) निवड नस्ती (तांशि-७).